सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात ६ शासकीय ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र व ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, कोसबाड हिल यांना ३६ - सहायक अनुदाने (वेतन) या उद्दिष्टाखाली अनुदान वितरण.
पाचवा हप्ता (वेतन)

मुख्य लेखाशिर्ष - २४१५०६२४, २४१५०३१२.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः प्रशिक्षण-२०२४/प्र.क्र.७९/आस्था-१५
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई- ४०० ००१.
दिनांक : ०३ मार्च, २०२५.

वाचा :

१. ग्रा.वि.व ज.वि., शा.नि.क्र. प्रशिक्षण-२०९३/प्र.क्र. ८४५/०९, दि.१७.०९.१९९३.
२. ग्रा.वि.व ज.वि., शा.नि. क्र.- प्रशिक्षण ११९९/प्र.क्र.५८१/६१, दि.२३.९.१९९८
३. ग्रा.वि.व ज.वि., शा.नि.क्र.-प्रशिक्षण-२०००/प्र.क्र.८५९/४४, दि.१२.६.२००१.
४. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ.-३, दि.२५.०७.२०२४ व दि.१२.०२.२०२५.
५. ग्रा.वि.वि, शा.नि.क्र. अनुग्रा-२०२४/प्र.क्र. ४५/आस्था-१५, दि.३०.४.२०२४ व दि.०६.०८.२०२४.
६. ग्रा.वि.वि, शा.नि.क्र. अनुग्रा-२०२४/प्र.क्र. ४९/आस्था-१५, दि.३०.४.२०२४ व दि.०६.०८.२०२४.
७. ग्रा.वि.वि, शा.नि.क्र. पुरक-२०२४/प्र.क्र.१०३/आस्था-१५, दि.२१.०८.२०२४
८. ग्रा.वि.वि, शा.नि.क्र. अनुग्रा-२०२४/प्र.क्र. ७९/आस्था-१५, दि.२७.११.२०२४ व दि.०४.०२.२०२५.

प्रस्तावना :

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता मागणी क्र. एल - ३, लेखाशिर्ष, २४१५ अंतर्गत खालील तक्त्यात नमुद केल्यानुसार अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे.

(रक्कम : हजारात)

| अ. क्र. | लेखाशिर्ष | अर्थसंकल्पिय तरतूद | | |
|---|---|---|---|---|
| | | वेतनेतर | वेतन | पुरक मागणी |
| १ | २४१५०६२४ (६ शासकीय ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र ) | ४९१२.०० | ७२३६९.०० | ०.०० |
| २ | २४१५०३१२ (ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र कोसबाड) | ८९०.०० | ३५७२.०० | २५१८.०० |

उपरोक्त अर्थसंकल्पिय तरतूदीच्या मर्यादेत ३६, सहायक अनुदाने (वेतन) या उद्दिष्टाकरीता पाचवा हप्ता वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :

सन २०२४-२५ या वित्तीय वर्षाकरीता ग्रामसवेक प्रशिक्षण केंद्रांना संदर्भ क्र.५ ते ८ येथील शासन निर्णयान्वये ३१ - सहायक अनुदाने (वेतनेतर) व ३६ - सहायक अनुदाने (वेतन) या उद्दीष्टाकरिता पुढीलप्रमाणे अनुदान वितरित करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

(रक्कम : हजारात)

| अ. क्र. | लेखाशिर्ष | शा.नि. दि.३०.०४.२०२४ पहिला हप्ता (वेतन) | शा.नि. दि.०६.०८.२०२४ दुसरा हप्ता (वेतन) | शा.नि. दि.२१.०८.२०२४ (७वा वेतन आयोग फरक) (वेतन) | शा.नि. दि.२७.११.२०२४ तिसरा हप्ता (वेतनेतर) | शा.नि. दि.०४.०२.२०२५ चौथा हप्ता (वेतन) |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | २४१५०६२४ | २४१२३.००० | २६५३५.३०० | ०.०० | २९४७.२० | १०८५५.३५० |
| २ | २४१५०३१२ | ११९०.६६४ | १३०९.७३६ | २५१८.०० | ५३४.०० | ५३५.८०० |

२. आता, वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ.-३, दि.१२.०२.२०२५ नुसार तसेच संबंधित प्रशिक्षण केंद्राच्या मागणीनुसार ६ शासकीय ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र (लेखाशिर्ष २४१५०६२४) यापैकी ४ शासकीय ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्रांना तसेच ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र - कोसवाड हिल (लेखाशिर्ष २४१५०३१२) यांना ३६ - सहायक अनुदाने (वेतन) या उद्दीष्टाकरिता अनुक्रमे रु.७८,९१,८५०/- (रुपये अठ्याहत्तर लक्ष एक्याण्णव हजार आठशे पन्नास फक्त) व रु.३,५७,२००/-(रुपये तीन लक्ष सत्तावन्न हजार दोनशे फक्त) इतका निधी पाचवा हप्ता म्हणून वितरित करण्यास शासन मान्यता देत आहे.

३. प्रशिक्षण केंद्राना अनुदान द्यावयाच्या कार्यपध्दतीबाबत शासन परिपत्रक क्रमांक प्रशिक्षण-११९८/प्र.क्र.५८१/६१ दि.२३ सप्टेंबर, १९९८ व शासन परिपत्रक, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक प्रशिक्षण २०००/प्र.क्र.८५९/४४, दि.१२ जून २००१ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या सूचनांच्या अनुंषगाने उपायुक्त (आस्था), पुणे, छ.संभाजीनगर, नागपूर व कोकण विभाग यांनी सदर प्रशिक्षण केंद्रास दरमहा अनुदान अदा करण्याबाबत त्वरीत कार्यवाही करावी. तसेच संदर्भ क्रमांक १ च्या शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक १२ मधील अटीनुसार केंद्रानी खर्च करावा.

४. सदर निधी वितरणाकरिता तसेच निधी ज्या बाबींकरीता मंजूर करण्यात आला आहे, त्याच बाबींवर खर्च करण्यात येईल याची काटेकोर अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित उपायुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय यांची असेल. तसेच सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तात्काळ सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.

५. हा खर्च "मागणी क्र.एल ३, २४१५, कृषि विषयक संशोधन व शिक्षण, लेखाशिर्ष - २४१५०३१२ व २४१५०६२४ अंतर्गत ३६ - सहाय्यक अनुदाने (वेतन)" या उद्दिष्टाखाली टाकण्यात यावा आणि सदर खर्च यावर्षी लेखाशिर्षांतर्गत केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. तसेच हा खर्च त्याच संकेतांकाखाली खर्ची पडत असल्याबाबत ताळमेळ घालून खातरजमा करावी व विभागीय आयुक्तांनी दरमहा शासनास कळवावे. सदर लेखाशिर्षाचे नियंत्रक अधिकारी तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून संबधित उपायुक्त (आस्थापना) हे काम पाहतील.

६. विभागीय आयुक्त कार्यालयाने प्रशिक्षण केंद्रास अनुदान वितरित करताना वेतन / वेतनेतर बाबीवर प्रत्यक्ष किती अनुदानाची आवश्यकता आहे याची खातरजमा करुन त्यांना आवश्यक तेवढी रक्कम उपलब्ध करुन द्यावी. उपरोक्त नमूद केलेल्या अनुदानापेक्षा जास्त अनुदान वितरित केले जाणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच प्रशिक्षण केंद्राने वेतन / वेतनेतरकरिता दरमहा किती अनुदान आवश्यक आहे, याची पूर्वसूचना संबंधित आयुक्त कार्यालयास द्यावी. त्याप्रमाणे आयुक्त कार्यालयाने वेतन / वेतनेतरकरिता अनुदान वितरित करावे. आवश्यक असलेल्या अनुदानाबाबत पूर्वसूचना न दिल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित केंद्राच्या प्राचार्यांची असेल.

७. या अनुदानातून संबंधित प्रशिक्षण केंद्राने केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचा अधिकार महालेखापाल, (लेखा) महाराष्ट्र-१ मुंबई आणि/किंवा महालेखापाल (लेखा) महाराष्ट्र-२ नागपूर यांना राहील व त्यांना त्यांचे हे काम योग्य तऱ्हेने पार पाडता यावे म्हणून संबंधित प्रशिक्षण केंद्र / संस्था, मदत / सुविधा पुरवतील.

८. हा शासन निर्णय दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग १, उपविभाग १ ते ५ मधील तरतूदीनुसार अनुक्रमांक ४, परि. २७ (२) नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२५०३०३१५४२३१४४२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

KAUSTUBH SUDHAKAR RANE

Digitally signed by KAUSTUBH SUDHAKAR RANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=78b99ab06beb869e5c389d21dd25d4a1a60d87c91cb0bb868021d70abc925c3b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BAAAFEFABBD1DFDAD691286AA9D035C7536D65527975D97124960BB882959CDB, cn=KAUSTUBH SUDHAKAR RANE
Date: 2025.03.03 15:43:36 +05'30'

**(कौस्तुभ राणे)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

प्रत-

१. विभागीय आयुक्त, कोकण, पुणे, नागपूर, व छ.संभाजीनगर (२ प्रती)
२. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, बाणेर रोड, पुणे
३. संचालक राज्य ग्रामीण विकास संस्था (यशदा), बाणेर रोड, पुणे
४. उप आयुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण, पुणे, नागपूर, व छ.संभाजीनगर.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, पालघर, पुणे, कोल्हापूर, जालना, परभणी व चंद्रपूर.
६. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र - १, मुंबई.
७. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर.
८. वित्त विभाग, कार्यासन क्र. अर्थ-१७/व्यय-१५
९. प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, कोसबाड हिल - जि.पालघर, मांजरी फार्म - जि.पुणे, कसबा-बावडा - जि.कोल्हापूर, जि.परभणी व सिंदेवाही - जि.चंद्रपूर.
१०. कार्यासन क्र. वित्त-१ व वित्त-७, ग्राम विकास विभाग.
११. निवड नस्ती का.क्र. आस्था-१५, ग्राम विकास विभाग.

## परिशिष्ट

| शासन निर्णय क्र.प्रशिक्षण-२०२४/प्र.क्र.७९/आस्था-१५, दि.०३ मार्च, २०२५ | | | |
|---|---|---|---|
| सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील पाचव्या हप्त्याचे वितरण (प्रत्यक्षात रुपये) | | | |
| अ.क्र. | ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्राचे नाव | वेतन | एकुण |
| १ | मांजरी फार्म, पुणे | २८,८२,५०४/- | २८,८२,५०४/- |
| २ | कसबा बावडा, कोल्हापूर | १७,४७,५०६/- | १७,४७,५०६/- |
| **अ** | **विभागीय आयुक्त, पुणे** | **४६,३०,०१०/-** | **४६,३०,०१०/-** |
| ३ | परभणी | १८,००,०००/- | १८,००,०००/- |
| **ब** | **विभागीय आयुक्त, छ.संभाजीनगर** | **१८,००,०००/-** | **१८,००,०००/-** |
| ४ | सिंदेवाही, चंद्रपूर | १४,६१,८४०/- | १४,६१,८४०/- |
| **क** | **विभागीय आयुक्त, नागपूर** | **१४,६१,८४०/-** | **१४,६१,८४०/-** |
| एकूण (अ+ब+क) | | ७८,९१,८५०/- | ७८,९१,८५०/- |

KAUSTUBH SUDHAKAR RANE

Digitally signed by KAUSTUBH SUDHAKAR RANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=78b99ab06beb869e5c389d21dd25d4a1a60d87c91cb0bb868021d70abc925c3b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BAAAFEFABBD1DFDAD691286AA9D035C7536D65527975D97124960BB882959CDB, cn=KAUSTUBH SUDHAKAR RANE
Date: 2025.03.03 15:44:02 +05'30'

(कौस्तुभ राणे)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.